महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) करीता अनुदान वितरीत करणेबाबत... (कार्यक्रम)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- मफुवि-१४२४/प्र.क्र.३१/७-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८.०३.२०२४.

**वाचा** :-१) वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि.१२.०४.२०२३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय समक्रमांक, दि.०९.०२.२०२४.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४.
४) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र.मफुकृवि/लेखा-२/११११/२०२४. दि.०५.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

सन २०२३-२४ या वर्षात, राज्यातील चारही कृषि विद्यापीठांना, मागणी क्र.डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण या मुख्य लेखाशिर्षाखाली कार्यक्रम योजनांतर्गत ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाकरीता वित्त विभागाने अर्थसंकल्पीय तरतूदीच्या २० टक्क्यांच्या मर्यादेत निधी बीम्स प्रणालीवर वितरीत केला होता. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठास संदर्भ क्र.२ अन्वये मंजूर रु.२०००.०० लाख अर्थसंकल्पीय तरतूदीपैकी रु.२००.०० लाख निधी आकस्मिक खर्चाकरीता व संशोधनाकरीता रु.२००.०० लाख असा एकूण रु.४००.०० लाख निधी राहुरी कृषि विद्यापीठास वितरीत करण्यात आला आहे.

सद्यस्थितीत, नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये मंजूर रु.१४००.०० लाख सुधारित अंदाजामधून निधी वितरीत करण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुषंगाने, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या विद्यापीठास संशोधन विषयक प्रकल्पांकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या वर्षात महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठास मागणी क्र.डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१,पीकसंवर्धन (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००७२) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या बाबीकरीता एकूण रु.१४००.०० लाख इतके सुधारित अंदाज मंजूर करण्यात आले आहे. त्यासअनुसरुन, नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांनी उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये विद्यापीठाच्या आकस्मिक खर्चाकरीता व

विद्यापीठांतर्गत सुरु असलेल्या संशोधनविषयक प्रकल्पांकरीता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठाच्या संशोधन प्रकल्पांकरीता एकूण रु.५००.०० लाख (अक्षरी रु.पाच कोटी) एवढे अनुदान पुढीलप्रमाणे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ. क्र. | लेखाशिर्ष/उपशीर्ष | मूळ तरतूद | सुधारित अंदाज | संशोधन प्रकल्प | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १. | मागणी क्र.डी-३, २४१५ कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१,पीकसंवर्धन (००) (०८) डॉ.पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ००९९) ३१,सहायक अनुदाने (वेतनेतर) | २०००.०० | १४००.०० | शाश्वत उत्पादन व मुल्यवर्धनासाठी सोयाबीन संशोधनाचे बळकटीकरण. | ८०.०० |
| २. | | | | कपाशीची बी. टी. जणुके सरळ वाणामध्ये समावेश करुन कपाशीचे सरळ बी.टी. वाण विकसीत करणे. | ८०.०० |
| ३. | | | | काटेकार शेतीसाठी डिजीटल तंत्रज्ञानावर आधारीत “सेन्टर ऑफ एक्सलेन्स”. | ८५.०० |
| ४. | | | | हरभरा पिकाचे दुष्काळ सहनशिल वाण/जीन प्रारूपे निर्माण करणे. | ७.०० |
| ५ | | | | रब्बी ज्वारीचे अधिक उत्पादनक्षम व पौष्टिक तसेच, यंत्राव्दारे काढणीस सुलभ वाणांची निर्मिती करणे | २५.०० |
| ६ | | | | नॅनोटेक्नॉलॉजी पीक संरक्षणासाठी आणि उत्पादकता व उत्पादन वाढीसाठी वापर | ८०.०० |
| ७ | | | | तेलबिया संशोधन केंद्र जळगाव या प्रकल्पाचे बळकटीकरण | ६.०० |
| ८ | | | | शाश्वत उत्पादनासाठी भुईमुग पीक संशोधनाचे बळकटीकरण | ० |
| ९ | | | | महाराष्ट्रासाठी पाण्याचा ताण व क्षार सहनशील ऊस वाण संशोधीत करणे | २३.०० |
| १० | | | | क्षारपड जमीन सुधरण्यासाठी संशोधन | ९.०० |
| ११ | | | | पिक रोग निदान केंद्र | ० |
| १२ | | | | मेटॅबोलोमिक्स प्रोफाईल ज्ञानावर आधारीत पिक वनस्पती प्रजनन | २५.०० |
| १३ | | | | आंतरराष्ट्रीय मानकानुसार किडनाशक अंशावर आधारीत संशोधन आधुनिकीकरण | ८०.०० |
| | **एकूण-** | **२०००.००** | **१४००.००** | - | **५००.००** |

२. सदर शासन निर्णयातील अनुदान हे खालील नमूद अटी व शर्तीच्या अधीन राहून वितरीत करण्यात येत आहे.

१) वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३, दि.०५.०२.२०२४ व दि.०४.०३.२०२४ च्या परिपत्रकामध्ये देण्यात आलेल्या सूचनांची काटेकोर अंमलबजावणी करण्यात यावी.

२) कृषि विद्यापीठांनी योजना आणि बाबनिहाय वितरीत केलेला निधी संबंधीत योजनेतील अनुज्ञेय बाबींसाठीच फक्त खर्च करावा.

३) वितरीत केलेला निधी कोणत्याही कारणास्तव अखर्चित/शिल्लक राहीला/राहणार असेल तर सदर अखर्चित/शिल्लक निधी शासनाचे मान्यतेशिवाय इतर गटांसाठी/योजनांसाठी/बाबींसाठी परस्पर वर्ग करु नये किंवा खर्च करु नये.

४) ज्या योजनांतर्गत योजनांचा कालावधी संपलेला आहे, अशा योजना संबंधित कालावधीनंतर शासनाची मान्यता मिळाल्याशिवाय योजनांतर्गत खर्चाने पुढे चालू ठेऊ नयेत.

५) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांनी कृषि विद्यापीठांना मंजूर केलेले सहाय्यक अनुदान, अनुदान सुत्राप्रमाणे बरोबर आहे किंवा कसे, तसेच, विहीत आदेश/कार्यपध्दतीनुसार खर्च करण्यात येत आहे किंवा कसे, याबाबत प्रत्येक आर्थिक वर्षाचा मुल्यमापन अहवाल शासनास संबंधित आर्थिक वर्ष समाप्त झाल्यापासून तीन महिन्यांच्या कालावधीत सादर करावा. तसेच, मागील आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी किती आहे हे तात्काळ शासनास कळवावे.

६) कृषि विद्यापीठांना त्यांचे महसूली उत्पन्न वापरण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. याबाबत विद्यापीठाने विहीत आदेश आणि कार्यपध्दतीनुसार उचित कार्यवाही करावी. तसेच महसूली उत्पन्न वाढविण्याच्या योजना राबविण्याबाबत कार्यवाही करावी.

७) विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम, १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम, १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता, १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिकाऱ्यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.

८) सदरचा निधी हा विद्यमान आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत करण्यात येत असल्याने त्याचा विनियोग हा विद्यमान आर्थिक वर्षामध्येच करण्यात यावा.आहरित केलेला निधी हा बँक खात्यावर अखर्चित राहणार नाही, याची दक्षता घ्यावी.त्यानुषंगाने, कोषागारातून निधी आहरित करावा.

कृषि विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी उपरोक्त अटी व शर्तींचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. यात्प्रित्यर्थ होणारा खर्च सन २०२३-२४ च्या अंदाजपत्रकात नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

४. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत मंजूर केलेले अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करावी.

५. सदर आदेश महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ व १४४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच, वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३२८१९२८३३३५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MITALI KALPESH CHAUDHARI

Digitally signed by MITALI KALPESH CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=22dfe162525b696c1facc3a8ddb26b639c76b455434e4cadbb3cd50474dcc58f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=60AE0791D92611A135CE51A5EE439203FDBDB395146D132620B3437EDED658CE, cn=MITALI KALPESH CHAUDHARI
Date: 2024.03.28 19:40:16 +05'30'

**( मिताली चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
२. वित्तीय सल्लागार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३. कुलगुरु/कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
४. नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
५. सहायक लेखाधिकारी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी.
६. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर व उपकोषागार अधिकारी, अहमदनगर
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
९. मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१०.उप मुख्य लेखापरीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
११.उप सचिव, वित्त विभाग (व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१२.उप सचिव,कार्यासन १४३१, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१३.उप सचिव, कार्यासन २अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
१४. कार्यासन ७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.